# एक चिमुकला धाडसी पोपट

## जातक कथा

मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी



# एक चिमुकला धाडसी पोपट

## जातक कथा

मराठी अनुवाद : नीलांबरी जोशी



एका घनगर्द हिरव्या जंगलात एक छोटा पोपट रहात होता.

एके दिवशी आभाळात काळे ढग दाटून आले. विजा चमकल्या आणि गडगडाट झाला. आकाशातून एक वीज येऊन एका निष्पर्ण मृतप्राय झाडावर कोसळली. ते झाड पटकन पेटलं. हवेच्या झोतानं सगळं जंगल पेटायला वेळ लागला नाही.

“आग!” धुराच्या वासानं तो छोटा पोपट ओरडला. “आग लागली आहे. नदीच्या दिशेने पळा..” “पळा लवकर.!” मग पंख फडकावत तो छोटा पोपट पण नदीच्या दिशेनं उडायला लागला. चिमणीसारखंच त्या पोपटाला उडता येत होतं.

जंगलाच्या वरुन आकाशात उडताना त्याला खाली आगीच्या ज्वाळा दिसत होत्या. जंगलातले हजारो वर्षांचे जुनेपुराणे वृक्ष पण आगीत जळून खाक होत होते. प्राणी त्या आगीत अडकले होते. पळून जायलाही त्यांना कोणताच मार्ग नव्हता. तेवढ्यात पोपटाला त्या प्राण्यांना वाचवायची एक युक्ती सुचली.





छोटा पोपट नदीच्या दिशेनं उडतच राहिला. नदीजवळ आधीच कित्येक प्राणी सुरक्षित आसरा शोधायला गोळा झाले होते. त्यांना तो म्हणाला, “हत्ती, तू तुझ्या सोंडेत पाणी घेऊन त्या आगीवर फवारे मार. आम्ही नदीत आमचं अंग भिजवतो. पानांच्या द्रोणांमध्ये पाणी घेऊन आम्ही आग विझवायचा प्रयत्न करतो. चला, सगळेजण मिळून आपलं जंगल आणि आपल्या मित्रांना वाचवूया.”

पण नदीच्या किनार्‍यावर जमा झालेले प्राणी हताशपणे म्हणाले, “पोपटा, आता कोणीच काही करु शकणार नाही. खूप उशीर झालाय.”

“हो.. हे बरोबर आहे”. चित्ता म्हणाला. “मी खरं तर वेगानं धावतो. पण आगीच्या ज्वाळा त्यापेक्षाही वेगानं लपेटतात.”

“आणि आम्ही कितीही शक्तिशाली असलो ..” हत्ती जरा ओरडूनच म्हणाला.. “तरी आम्ही त्या ज्वाळांशी सामना करु शकत नाही.”

“हताश परिस्थिती आहे...” सगळेच प्राणी म्हणाले.



पण तरीही त्या छोट्याशा पोपटाला आशेचा किरण दिसत होता. त्यानं आपले चिमुकले पंख पाण्यात बुडवले आणि चोचीत पाणी घेऊन जंगलाच्या दिशेनं उडला.
आगीच्या ज्वाळा छोट्या पोपटाला लपेटायचा प्रयत्न करत होत्या. त्या ज्वाळांचा चटका बसत होता. आकाश काळ्या धुरानं माखलं होतं. सर्व बाजूंनी ज्वाळा उठत होत्या. पण त्या आगीतून स्वत:ला वाचवत छोटासा पोपट धाडसानं आकाशातून उडत होता.

जंगलाच्या मध्यभागात जाऊन पोपटानं आग जिथे सर्वात जास्त धुमसत होती तिथे आपले पंख फडफडवले. त्याच्या पंखांना लागलेले पाण्याचे थेंब मोत्यासारखे चमकत आगीत जाऊन पडले. पोपटानं तोंडात धरलेल्या पानांच्या द्रोणातलंही पाणी तिथे ओतलं. पाण्याच्या त्या थेंबाचा “चुर्र” असा आवाज होऊन ते थेंब क्षणार्धात नाहीसे झाले.

त्यानंतर तो छोटा पोपट परत नदीच्या दिशेनं गेला. त्यानं परत एकदा नदीत बुडी घेऊन पंख ओले केले. परत पानांच्या द्रोणात पाणी घेतलं.
“तू आमच्याबरोबर या नदीकिनार्ायावरच थांब”. एक प्रेमळ हरणानं त्याला विनंती केली. “आगीत होरपळायला परत जाऊ नको.”



“हे बरोबर आहे”. सामर्थ्यशाली वाघ म्हणाला. “आगीनं लपेटलेल्या जंगलाला पाण्याचे काही थेंब वाचवू शकणार नाहीत.”

“आता खूपच उशीर झाला आहे”. बाकीचे प्राणी म्हणाले. “छोट्या पोपटा, इथे आमच्याबरोबरच सुरक्षितपणे रहा.”

“कोण जाणे, आपले प्रयत्न सफलही होतील”. छोटा पोपट दम खात म्हणाला. “मी माझे प्रयत्न चालू ठेवणार आहे.” असं म्हणून छोटा पोपट परत एकदा जंगलाच्या दिशेनं उडला. त्यानं परत पंख फडफडवून त्यातलं आणि द्रोणातलं पाणी खाली सांडलं. परत एकदा “चुर्र” असा आवाज आला.

अशा प्रकारे “नदीकडून जंगलाकडे.. जंगलाकडून नदीकडे” अशा खेपा तो छोटा पोपट घालत राहिला. त्याचे डोळे धुरानं चुरचुरत होते. त्याला खोकला येत होता. पण तरीही तो अथकपणे आपलं काम करत होता.

त्याचवेळी आकाशातून काही देवीदेवता चालले होते. नभाच्याही वरती आपल्या महालात बसून एकमेकांशी हसतखेळत गप्पा मारत होते. त्यांचं मस्तपैकी जेवण चाललं होतं. ते मद्याचाही आस्वाद घेत होते. त्यातल्याच एका देवतेनं लहानशा पोपटाला उडताना पाहिलं. “ते पहा..” ती म्हणाली. “तो छोटासा बेअक्कल पक्षी पाण्याच्या चार दोन थेंबांनी जंगलातली आग विझवायचा प्रयत्न करतोय.”
“हा तर विनोदच आहे..” दुसरी एक देवता म्हणाली.
“अशक्य आहे..” तिसरी एक देवता म्हणाली.
“आपण अयशस्वी होणार हे त्याला समजत नाही का..” पहिली देवता म्हणाली.



त्यानंतर पहिल्या देवतेनं आपली सोन्याची थाळी आणि चांदीची वाटी बाजूला सारली. तिनं एका गरुडाचं रुप धारण केलं. मग आपले विशाल पंख फडफडवत तो छोट्या पोपटापाशी गेला.

जेव्हा छोटा पोपट जंगलातल्या आगीच्या वरुन उडत होता तेव्हा गरुड त्याच्याजवळ गेला आणि म्हणाला, “अरे तू चिमुकला आहेस. परत जा बरं..” गरुड आपल्या भरदार आवाजात म्हणाला, “पाण्याच्या या चार दोन थेंबांनी जंगलातली ही आग विझणं शक्य नाही. जर जिवंत रहायचं असेल तर आता थांब. नंतर खूप उशीर झालेला असेल.” पण लहानशा पोपटानं गरुडाचं सांगणं ऐकून न ऐकल्यासारखं केलं. “गरुडा.. ” तो आपल्या नाजुक आवाजात म्हणाला, “माझ्याकडे आत्ता वेळ नाही. मला तुझा सल्ला नकोच आहे. मला तुझ्या मदतीची गरज आहे.” असं म्हणून पोपट परत आपल्या कामाला जुंपला. सोनेरी गरुडाला हे पाहून आश्चर्य वाटलं. प्रत्येक क्षणी आगीची धग आणि ज्वाळा उफाळत होत्या. मग गरुड आपले पंख फडफडवत वर थंड हवेत उडाला.



गरुडाच्या डोळ्यासमोर अजून तो लहानसा पोपटच तरळत होता. इतर देवी-देवता थट्टामस्करीत आणि खाण्यापिण्यात मश्गुल होते. खाली जंगलात आग पसरत चालली होती. आपल्या आयुष्यात त्या देवतेला प्रथमच स्वत:ची शरम वाटली. “शेवटी, आपण सर्वजण देव आहोत. आपल्याला काही तरी करायला हवं.” त्यानंतर अचानक तो सोनेरी गरुड हमसून हमसून रडायला लागला. त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वहायला लागल्या. त्या अश्रूरुपी थंड पावसासारख्या धारा जंगलातल्या आगीवर, जनावरांवर आणि छोट्या पोपटावर कोसळल्या.

“मग काय झालं?” जिथे जिथे सोनेरी गरुडाचे अश्रू पडले तिथली आग विझत गेली. जळलेल्या फांद्यावरचे पाण्याचे थेंब मोत्यासारखे चमकायला लागले. होरपळणाऱ्या जमिनीची तलखी ते अश्रू पिऊन कमी झाली. जिथे कुठे ते अश्रू सांडले तिथे परत हिरव्या रोपांनी मान वर काढली. ते नवजीवनाची संजीवनी देणारे अश्रू ठरले. जमिनीत कोळशासारखी माती भेदून नवीन अंकुरांनी जोम धरला. फांद्या, त्याला चमचमती पानं आणि रंगीबेरंगी फुलं परत एकदा बहरली.



छोट्या पोपटाला नवीन पंख फुटले. त्याच्या पंखांचा रंग, लाल, पानांसारखा हिरवा, सूर्यकिरणांसारखा पिवळसर आणि नदीच्या पाण्यासारखा निळा होता. ते रंग विलक्षण मोहक दिसत होते. पोपट सुरेख दिसत होता.

"आता आग विझली आहे." छोटा पोपट आनंदानं म्हणाला.. "बघा, धोका टळला आहे."

सगळे प्राणी एकमेकांकडे आश्चर्यानं पहायला लागले. अश्रूंच्या पावसानं ते पण तुकतुकीत दिसत होते. कोणत्याच प्राण्याला सुदैवानं जखमा झाल्या नव्हत्या.

"झिंदाबाद.." सगळे प्राणी एकमुखानं ओरडले.. "छोटा पोपट आणि जादूचा पाऊस. झिंदाबाद..!"



आता निळ्याभोर आकाशात लहानगा पोपट मित्रांबरोबर खुषीत उडत होता. त्याला जितकं जमलं तितकं त्यानं केलं आणि जंगल आणि प्राणी दोघांनाही वाचवलं.

